**सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत वितरण करण्यात येणाऱ्या जीवनावश्यक वस्तूंवर देखरेख ठेवण्यासाठी दक्षता समित्या. सुधारित आदेश.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: दक्षस-१०१०/प्र.क्र. ६१/नापु २१,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५ ऑक्टोबर,२०१६

**संदर्भ :** १) शासन निर्णय क्रमांक: दक्षस-१००७/प्र.क्र.५४८/नापु २१, दि.२३ जानेवारी,२००८.
२) शासन निर्णय क्रमांक: दक्षस-१०१०/प्र.क्र.१२९/नापु २१, दि.२१ ऑक्टोबर,२०१०.

**प्रस्तावना :**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत वितरीत करण्यात येणाऱ्या जीवनावश्यक वस्तूंच्या वितरणावर देखरेख ठेवण्यासाठी राज्य शासनाने विविध स्तरावर दक्षता समित्या गठीत केल्या असून, राज्यस्तरीय सल्लागार समितीही गठीत केली आहे. सदर दक्षता समित्यांच्या बैठका नियमितपणे आयोजित करण्यासाठी, दक्षता समित्या वेळोवेळी गठीत करुन दक्षता समितीवर अशासकीय सदस्यांची नियुक्ती वेळोवेळी होणे क्रमप्राप्त ठरते. ही बाब विचारात घेवून, संदर्भीय शासन निर्णय क्रमांक २ अधिक्रमित करुन अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या संदर्भात सुधारित तरतूद निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. तालुका पातळीवरील, जिल्हा पातळीवरील अ,ब, आणि क वर्ग नगरपालिका आणि महानगरपालिका स्तरावरील तसेच, मुंबई/ठाणे शिधावाटप क्षेत्रातील दक्षता समित्यांवरील अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या करताना संबंधित जिल्हयाच्या पालकमंत्र्यांच्या शिफारशीनुसार सदर अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या करण्यात याव्यात.

२. अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या करताना संबंधित दक्षता समितीच्या सदस्य सचिवांनी संबंधित अध्यक्षांना/जिल्हयाच्या पालकमत्र्यांना अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीसंबंधी ३० दिवसांत शिफारस करण्याबाबत कळवावे.

३. ज्या स्तरावरील दक्षता समितीसाठी अशा प्रकारच्या शिफारशी संबंधित जिल्हयाच्या पालकमंत्र्यांकडून एक महिन्याचा कालावधी उलटून गेला असतानाही प्राप्त होणार नाहीत, त्याबाबत संबंधित दक्षता समिती सदस्य सचिव यांनी तातडीने शासनास कळविणे बंधनकारक राहिल.

४. ज्या ठिकाणी एक महिन्याच्या कालावधीमध्ये संबंधित जिल्हयाच्या पालकमंत्र्यांकडून अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या संदर्भातील शिफारशी प्राप्त होणार नाहीत अशा ठिकाणी विभागाचे मा.मंत्री, महोदय अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या करतील व त्याअनुषंगाने संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या तात्काळ कराव्यात.

५. वरील सुधारणांव्यतिरीक्त संदर्भिय शासन निर्णय, दिनांक २३/०१/२००८ मधील इतर सर्व तरतूदी व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणा कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१६१०२५११४४४७८०६ असा आहे.सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2016.10.25 11:46:22 +05'30'

**( सतीश सुपे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
३) सर्व जिल्हाधिकारी
४) सर्व विभागीय उप आयुक्त पुरवठा,
५) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
६) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
७) सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी.
८) मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव.
९) मा.मंत्री, (अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) यांचे खाजगी सचिव.
१०) मा.राज्यमंत्री, (अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) यांचे खाजगी सचिव.
११) सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
१२) सर्व कार्यासने,अनापुवग्रासंवि.
१३) निवडनस्ती नापु २१